वनसेवेतील अधिकाऱ्यांना / कर्मचाऱ्यांना
वनसंरक्षणाच्या प्रभावी कामाबद्दल तसेच
वनसेवेतील उत्कृष्ट कार्यालयाबद्दल पदके
देण्याबाबत -सन २०१५-१६.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: एफएसटी-०४/१६/प्र.क्र.१४७/फ-४**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: १५ मार्च, २०१७

वाचा:-१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक एफएसटी-१४/०३/प्र.क्र.२३६/०८/फ-४, दिनांक १२.०१.२००४.
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक एफएसटी-०८/१२/प्र.क्र.३८३/फ-४, दिनांक २९.१०.२०१२.

**प्रस्तावना:**

वनसंपत्तीचे संरक्षण व संवर्धनाचे काम प्रभावीपणे करणाऱ्या अधिकारी व कर्मचारी ह्यांचे मनोधैर्य वाढविण्याकरीता तसेच त्यांच्या उत्कृष्ट कार्याबद्दल प्रोत्साहीत करण्याकरीता त्यांना राज्य स्तरावरुनं पुरस्कार / बक्षिसे देण्याची योजना कार्यान्वित करण्यात आली आहे. सदर योजनेनुसार वनरक्षक ते उप वनसरंक्षक या संवर्गातील कर्मचारी / अधिकाऱ्यांना त्यांनी केलेल्या वनसंरक्षणार्थ / वन्यजिव संरक्षणार्थ /शोधकार्य / वनव्यवस्थापन / नाविण्यपुर्ण शोध याबद्दल प्रतिवर्षी सुवर्ण व रजत पदके देण्यात येतात.

२. अशी पदके देण्यापूर्वी वन विभागातील सर्व संबंधित मुख्य वनसंरक्षकांकडून उत्कृष्ट काम केलेल्या वनरक्षक ते उप वनसंरक्षक संवर्गातील अधिकारी / कर्मचारी यांच्या नावाच्या शिफारशी मागविण्यात येतात. सदर शिफारशीस अनुलक्षून त्यांनी केलेल्या नाविण्यपुर्ण कामाचे स्वरुप तसेच त्यांचे गोपनीय अहवाल, सचोटी, चारित्र्य, तांत्रिक कार्यक्षमता, बुध्दिमत्ता व त्यांनी विकसीत केलेले तंत्रज्ञान इ. बाबींचा विचार करुन पदके प्रदान करण्यासाठी अधिकारी/ कर्मचाऱ्यांची निवड करण्यासंदर्भात सचिव (वने) यांच्या अध्यक्षतेखालील राज्यस्तरीय समितीची दि. १०.०३.२०१७ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती.

**शासन निर्णय:**

सन २०१५-१६ या वर्षात उत्कृष्ट काम केलेल्या ६ कार्य प्रकारासाठी पदके देण्याच्या अनुषंगाने प्राप्त झालेल्या प्रस्तावाची तपासणी केल्यानंतर संबंधित अधिकारी/ कर्मचारी यांचे गोपनीय अहवाल सचोटी, चारित्र्य , तांत्रिक कार्यक्षमता व त्यांनी विकसीत केलेले तंत्रज्ञान इ. बाबी विचारात घेऊन सदरहू प्रस्तावातील २६ अधिकारी / कर्मचारी यांना पदके देऊन गौरविण्याचा शासनाने निर्णय घेतलेला आहे. सदरहू अधिकारी/ कर्मचारी यांची नावे सोबत परिशिष्ट क्र.१ मध्ये नमूद केली आहेत.

समितीच्या बैठकीमध्ये श्री. एच.जी. धुमाळ, उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग, सातारा यांचे प्रस्तावावर विचार झाला. सदर प्रस्तावामध्ये वन/वन्यजीव संरक्षण बाबत कामे जास्त प्रमाणात असल्याने त्यांना वन/वन्यजीव संरक्षण या कार्यप्रकारात सुवर्ण पदक देण्याबाबत समितीने केलेल्या शिफारशीस शासन मान्यता देण्यात येत आहे.

तसेच वन विभागामध्ये बोरीवली रेस्क्यू संघाची एकसंघ कामे असल्याचे निदर्शनास आल्याने संघासाठी पदक देण्याची तरतूद सध्या प्रचलित असलेल्या शासन निर्णयामध्ये नसल्याने याबाबत नव्याने धोरण ठरविण्यात येईल.

पदके देऊन गौरविण्यात आलेले अधिकारी/ कर्मचारी यांच्या सेवापुस्तकात वरील बाबींची नोंद संबंधित विभाग / कार्यालय प्रमुख यांनी घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०३१५१७१८१२१३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

Dattatray Laxman Thorat

Digitally signed by Dattatray Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e99493394e30f531116ee97373b411b529e251aecc25fd9c455defa0031292a7, cn=Dattatray Laxman Thorat
Date: 2017.03.15 17:19:58 +05'30'

**(डी.एल.थोरात)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण) पुणे.

**प्रत:-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य, वनविकास महामंडळ मर्यादित, नागपूर
४) प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजीक वनीकरण, पुणे
५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन-दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर
६) सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर
७) सर्व मुख्य वनसंरक्षक
८) सर्व वनसंरक्षक
९) सर्व सह संचालक, सामाजीक वनीकरण वृत्त
१०) सर्व प्रादेशीक व्यवस्थापक, एफ.डी.सी.एम. लि.
११) सर्व उप वनसंरक्षक
१२) सर्व उप संचालक, सामाजीक वनीकरण विभाग
१३) सर्व विभागीय व्यवस्थापक, एफ.डी.सी.एम. लि.
१४) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई (पत्राने)
१५) प्रसिध्दि व माहिती अधिकारी (वने), महाराष्ट्र राज्य, नागपूर
१६) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
१७) मा. राज्य मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
१८) वन विभागातील सर्व सह सचिव, उप सचिव व कार्यासन अधिकारी
१९) सोबत जोडलेल्या परिशिष्टातील सर्व पदक विजेत्या अधिकारी/ कर्मचारी यांना अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन-दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे मार्फत
२०) निवड नस्ती, फ-४ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

**वनसेवेतील अधिकाऱ्यांना / कर्मचाऱ्यांना वनसंरक्षणाच्या प्रभावी कामाबद्दल तसेच वनसेवेतील उत्कृष्ट कार्याबद्दल पदके देण्याबाबत सन २०१५-१६.**

**परिशिष्ट क्र.१**

शासन निर्णय क्रमांक: एफएसटी-०४/१६/प्र.क्र.१४७/फ-४

दिनांक: १५ मार्च, २०१७

| अक्र. | कार्यप्रकार | संवर्ग | वनवृत्ताचे नांव | कर्मचारीयांचे-अधिका/ नांव | प्राप्त पदक |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | अ) वन / वन्यजीव संरक्षण | वनरक्षक | अमरावती | श्री. समाधान रघुनाथ मान्टे. | सुवर्ण |
| | | | धुळे | श्री. सुरेश रूपचंद देसले. | सुवर्ण |
| | | | गडचिरोली | श्री. आर. टी. समर्थ. | सुवर्ण |
| | | | नाशिक | श्रीमती ललिता काशिनाथ शेखरे. | रजत |
| | | | यवतमाळ | श्री. बरकत खान अमीर उल्ला खान. | रजत |
| | | | अमरावती | श्री. जाकीर जैनुल पटेल. | रजत |
| | | वनपाल | गडचिरोली | श्री. विवेक भास्करराव राजुरकर. | सुवर्ण |
| | | | औरंगाबाद | श्री. शेषराव बापुराव तांबे. | सुवर्ण |
| | | | नागपूर | श्री. निशीकांत होमदेव कापगते. | रजत |
| | | | धुळे | श्री. राकेश नागु खैरनार. | रजत |
| | | वनक्षेत्रपाल | अमरावती | श्री. एस. बी. वाकोडे. | सुवर्ण |
| | | | धुळे | श्री. सुभाष रामशंकर पाटील. | रजत |
| | | सहाय्यक वनसंरक्षक | नाशिक | श्री. सुरेश सोपान दोंड. | सुवर्ण |
| | | | अमरावती | श्री. एस. ए. पार्डीकर. | रजत |
| | | विभागीय वनअधिकारी/ उपवनसंरक्षक | सा.व. पुणे | श्री. हनुमंत गोविंद धुमाळ, उपसंचालक | |
| २ | ब) वन / वन्यजीव व्यवस्थापन | वनरक्षक | पुणे | श्री. दत्तात्रय दौलतराव फापाळे. | सुवर्ण |
| | | | चंद्रपूर | श्री. ए. आर. कवासे. | रजत |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | वनपाल | चंद्रपूर | श्री. के. व्हिधानकुटे. | सुवर्ण |
| | | | अमरावती | श्री. पंकज वि. अळसपुरे. | रजत |
| | | वनक्षेत्रपाल | नागपूर | श्री. मनोज दिगंबर मोहिते. | सुवर्ण |
| | | | गडचिरोली | श्री. सचिन नानासाहेब डोंबाळे. | रजत |
| | | विभागीय वन अधिकारी/ उपवनसंरक्षक | पुणे | श्री. एस. के. फटांगरे, विभागीय वन अधिकारी | सुवर्ण |
| ३ | क) नाविण्यपूर्ण/ इतर विकासात्मक/ पूरक कार्य | उपरोक्त प्रादेशिक व वन्यजीव शाखेव्यतिरिक्त विभागातील वनरक्षक ते उपवनसंरक्षक | अमरावती कार्य आयोजना विभाग | श्री. मुफद्दल आशिक हुसैन शाकीर, वनरक्षक | सुवर्ण |
| ४ | ड) धाडसी/शौर्य/ प्रगतीचे दृष्टीने केलेले विशिष्ट कार्य | वनरक्षक ते उपवनसंरक्षक वगळून. | सा.वि.व. पुणे | श्री. संजय तानाजी भोईटे, शिपाई | सुवर्ण |
| | | | नागपूर | श्री. सुनिल व्ही. देशमुख, वनसर्व्हेक्षक | रजत |
| ५ | फ) वन विस्तार | सामाजिक वनीकरण विभागाचे अधिकारी व कर्मचारी वनरक्षक ते उपवनसंरक्षक ह्यांचेसह | सावृत्त.व. औरंगाबाद | श्री. विजय नारायण सातपुते, सहाय्यक संचालक | सुवर्ण |

Dattatray Laxman Thorat

Digitally signed by Dattatray Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e99493394e30f531116ee97373b411b529e251aecc25fd9c455defa0031292a7, cn=Dattatray Laxman Thorat
Date: 2017.03.15 17:21:10 +05'30'

**(डी.एल.थोरात)**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग